**<u>१४ व्या वित्त आयोगांतर्गत स्थापन केलेल्या १४ कौटुंबिक न्यायालयातील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत...</u>**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कौटुंन्या १११८/प्र.क्र.५४/का-नऊ**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक:- ११ मार्च, २०२०.

**<u>पहा-</u>** १) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र.अेचसीटी-१००२/१२८९/(१६२)/नऊ, दि. ०८.०९.२००३
२) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र.कौटुंन्या-१११५/६२९/प्र.क्र.१८९/नऊ, दि.२०.०७.२०१६
३) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र.कौटुंन्या-१११६/३७६/प्र.क्र.८६/नऊ, दि. १३.१०.२०१६
४) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र.कौटुंन्या-१११७/प्र.क्र.९३/नऊ, दि. २८.४.२०१७
५) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र.कौटुंन्या-१११६/३७६/प्र.क्र.८६/नऊ, दि. १५.०६.२०१७
६) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र.कौटुंन्या-१११६/प्र.क्र.२२२/नऊ , दि. १८.०८.२०१७
७) जिल्हा व सत्र न्यायालय, रायगड-अलिबाग यांचे क्र. प्रशा/७७७७ सन२०१९, दि.२३.१२.२०१९ चे पत्र
८) जिल्हा व सत्र न्यायालय, परभणी यांचे पत्र क्र.जा.क्र.आस्था/ब-४/१०१३/२०२०, दि.१८.१.२०२०.
९) जिल्हा व सत्र न्यायालय, यवतमाळ यांचे पत्र क्र.जा.क्र.४३९/आस्था/२०२०, दि.२३.०१.२०२०.
१०) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.१२.०२.२०२०.

**<u>प्रस्तावना :-</u>**

१४ व्या वित्त आयोगांतर्गत एकूण १४ कौटुंबिक न्यायालये स्थापन केलेली आहेत. त्यातील लातुर येथील कौटुंबिक न्यायालयासाठी संदर्भीय अ.क्र. २ येथील शासन निर्णयान्वये, बीड, जालना, उस्मानाबाद व परभणी येथील कौटुंबिक न्यायालयासाठी संदर्भीय अ.क्र.५ येथील शासन निर्णयान्वये, तर उर्वरीत ९ कौटुंबिक न्यायालयासाठी संदर्भीय अ.क्र.६ येथील शासन निर्णयान्वये पदनिर्मिती करण्यात आली आहे. या सर्व १४ कौटुंबिक न्यायालयासाठीच्या अस्थायी पदांना पुढील कालावधीसाठी मुदतवाढ देणे आवश्यक आहे. कौटुंबिक

न्यायालयाच्या अस्थायी पदांबाबत संदर्भीय अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये वित्त विभागाच्या दि.१०.९.२००१ च्या शासन निर्णयातील तरतूदीमधुन वगळण्यात आले आहे. तसेच संदर्भीय अ.क्र.१० येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये दि.१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेले आहेत. त्यानुसार सदर १४कौटुंबिक न्यायालयासाठीची अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१४ व्या वित्त आयोगांतर्गत स्थापन केलेल्या लातूर, बीड, जालना, उस्मानाबाद, परभणी, सांगली, रायगड-अलिबाग, जळगाव, यवतमाळ, अहमदनगर, सातारा, धुळे, बुलढाणा व भंडारा या १४ कौटुंबिक न्यायालयासाठीच्या खालील अस्थायी पदांना दि.१ मार्च, २०२० ते दि. ३१ ऑगस्ट, २०२० पर्यत मुदतवाढ देण्यात येत आहे.

**कौटुंबिक न्यायालय , लातूर :- न्यायाधीश व त्यांचा सहाय्यभूत कर्मचारी वर्ग**

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १. | न्यायाधीश | १ |
| २. | विवाह समुपदेशी | १ |
| ३. | प्रबंधक | १ |
| ४. | सहायक अधिक्षक | १ |
| ५. | लघुलेखक (उच्चश्रेणी) | १ |
| ६. | लघुलेखक (निम्नश्रेणी) | १ |
| ७. | वरिष्ठ लिपिक | १ |
| ८. | कनिष्ठ लिपिक | २ |
| ९. | बेलिफ | १ |
| १०. | शिपाई | २ |
| | **एकूण** | **१२** |
| बाह्ययंत्रणेद्वारे-सफाईगार-१ व पहारेकरी-१ अशी २ पदे. | | |

**इतर १३ कौटुंबिक न्यायालयये :- न्यायाधीश व त्यांचा सहाय्यभूत कर्मचारी वर्ग**

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १. | न्यायाधीश | १३ |
| २. | प्रबंधक | १३ |
| ३. | सहायक अधिक्षक | १३ |
| ४. | लघुलेखक (उच्चश्रेणी) | १३ |
| ५. | विवाह समुपदेशी | १३ |
| ६. | वरिष्ठ लिपिक | १३ |
| ७. | लिपिक-टंकलेखक | ३९ |
| ८. | शिपाई-पहारेकरी | ३९ |
| | **एकूण** | **१५६** |
| वाहन चालक- ठोक मासिक मानधन (बाह्ययंत्रणेद्वारे)- १३ | | |

२. याकरिता येणारा खर्च "मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान-१०२-उच्च न्यायालये (१३) १४ व्या वित्त आयोगांतर्गत योजना (१३)(०२) कौटुंबिक न्यायालये (अनिवार्य), संकेतांक क्र. (२०१४ ०६०१), या लेखाशिर्षाखाली" खर्ची टाकण्यात यावा व तो त्या शीर्षाखालील सन २०२०-२०२१ या वर्षासाठी मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१२.०२.२०२० द्वारे प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२००३१२१५३९३२१५१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Uday Balkrishna Shukla

Digitally signed by Uday Balkrishna Shukla
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=25569b2f94f1c4543dd14cfd7554a74f343a754d96291ae76706a168af42cab3, serialNumber=7b8594c3caa0542cc27f913c48e1f9c0084209e339cce7fd9de455fe24a26bbb, cn=Uday Balkrishna Shukla
Date: 2020.03.12 15:42:33 +05'30'

**( उदय बा. शुक्ल )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रति,**

१) महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,

२) प्रमुख न्यायाधीश/न्यायाधीश, जिल्हा व सत्र न्यायालय/कौटुंबिक न्यायालय, लातूर, बीड, जालना, उस्मानाबाद, परभणी, सांगली, रायगड-अलिबाग, जळगाव, यवतमाळ, अहमदनगर, सातारा, धुळे, बुलढाणा व भंडारा ,

३) महालेखापाल-एक/दोन (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,

४) महालेखापाल-एक/दोन ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,

५) जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर, बीड, जालना, उस्मानाबाद, परभणी, सांगली, रायगड-अलिबाग, जळगाव, यवतमाळ, अहमदनगर, सातारा, धुळे, बुलढाणा व भंडारा

६) वित्त विभाग व्यय-५,

७) विधि व न्याय विभाग कार्यासन-२३, २४ व २५

८) निवड नस्ती.